**निवृत्ती वेतनविषयक प्रकरणे /मा. लोकआयुक्त**
**<u>संदर्भ त्वरेने हाताळण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
परिपत्रक क्र.सेनिवे-२००९/प्र.क्र.१८१/आस्था-११,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक - १८ नोव्हेंबर,२००९.

**<u>वाचा:</u>** शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक-सेनिवे-१०००/प्र.क्र.१४९/ आस्था-११, दिनांक २२.११.२००७.

**<u>परिपत्रक</u>**:- सेवानिवृत्त जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांना तसेच त्यांच्या वारसाना निवृत्तीवेतन / कुटुंब निवृत्ती वेतनविषयक लाभ वेळेवर अदा करण्याबाबत शासन वारंवार सूचना देत असते. तरी देखील जिल्हा परिषद कार्यालयांकडून त्याची गांभीर्याने दखल घेतली जात नाही. कर्मचारी सेवानिवृत्त होण्यापूर्वी ६ महिन्यांच्या आत त्यांचे सेवानिवृत्तीचे प्रकरण सक्षम प्राधिकाऱ्याकडे मंजूरीसाठी सादर केले जात नाही. काही प्रकरणे सेवानिवृत्तीनंतरही १-२ वर्षे अंतिम होत नाहीत. विभागीय चौकशी /न्यायिक प्रकरणे अशा प्रकारची वर्जित प्रकरणे वगळता कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्तीच्या दिनांकास निवृत्ती वेतनादि लाभ दिले गेले पाहिजेत. काही प्रकरणांमध्ये कर्मचाऱ्यांकडून शासनास येणे असलेल्या रकमांच्या कारणास्तव प्रलंबित राहतात. अशा प्रकरणांमध्ये संबंधित कर्मचाऱ्यांना त्या संबंधीची नोटीस पाठवून कर्मचाऱ्यांकडे पाठपुरावा करणे आवश्यक आहे. कर्मचाऱ्यास त्याच्याकडून कागदपत्रांच्या पूर्ततेअभावी निवृत्ती वेतन अंतिमत: निकाली काढण्यास विलंब होत असेल तर त्यास स्पष्टपणे तसे कळवावे. कर्मचाऱ्यांकडून कागदपत्रांची पूर्तता होताच विनाविलंब प्रकरण अंतिमत: निकाली काढावे.

२. कर्मचाऱ्यांस सेवानिवृत्तीनंतर आर्थिक विवंचना भासू नये, याची काळजी प्रशासनातील सर्व संबंधितांची आहे. त्यास हक्काच्या रकमा वेळेत दिल्यास कर्मचाऱ्यास त्याला व त्याच्या कुटुंबियांस मानसिक व आर्थिक त्रास होणार नाही. वेळच्यावेळी अशा निवृत्ती वेतनादि रकमा अदा केल्यास प्रशासनाविषयी गैरसमज होत नाही.

३. प्रलंबित निवृत्ती वेतनविषयक प्रकरणांचा आढावा उप मुख्य कार्यकारी अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग यांनी दर पंधरा दिवसांनी तसेच उप आयुक्त (आस्थापना) यांनी दर महिन्याला आढावा घेऊन प्रलंबित प्रकरणांचा निपटारा होईपर्यंत पाठपुरावा करावा.

४. निवृत्ती वेतनादि लाभ वेळेत मिळाले नाहीत तर वरिष्ठ अधिकारी शासन मा.लोक आयुक्त, मा.न्यायालय, इ. कडे संबंधित तक्रार अर्ज करतात. त्यामुळे निवृत्ती वेतनादि लाभांबाबतच्या किरकोळ बाबींमुळे खालच्या स्तरावरील कार्यालयातील कर्मचाऱ्यांपासून शासनापर्यंतच्या प्रत्येक टप्प्यावरील कार्यालयांच्या वेळेचा अपव्यय होतो. त्यामुळे निवृत्ती वेतनादि प्रकरणे वेळच्यावेळी हाताळणे आवश्यक आहे. तक्रारदाराच्या तक्रार अर्जासंबंधी मा. लोक आयुक्त कार्यालय जिल्हा परिषदांकडून परस्पर अहवाल मागविते. त्यासंबंधातील काही प्रकरणांमध्ये असे आढळून आले आहे की, मा. लोक आयुक्त कार्यालयाकडून वारंवार स्मरणपत्रे पाठवूनही त्यांच्याकडे अहवाल पाठविले जात नाहीत. अंतरिम उत्तर देखील पाठविले जात नाही. त्यानंतर मा. लोक आयुक्त शासनाकडून त्यासंबंधीचा अहवाल मागवितात. मा.लोक आयुक्त कार्यालयाकडील प्रकरणे वेळेवर हाताळली जात नाहीत, ही

अत्यंत गंभीर बाब आहे. मा. लोक आयुक्त प्रकरणांवर विधानसभा / विधान परिषद प्रश्नांप्रमाणे कार्यवाही करण्याच्या सूचना यापूर्वी वेळोवेळी दिलेल्या आहेत. तरीदेखील जिल्हा परिषदांकडून काही प्रकरणांमध्ये २-३ वर्षे कार्यवाही अंतिम केली जात नाही. अथवा त्यासंबंधी अहवाल पाठविले जात नाहीत. मा. लोक आयुक्तांकडे वेळीच अहवाल पाठविले न गेल्याने प्रकरणे सुनावणीसाठी ठेवली जातात. प्रकरणे संपूर्णतः जिल्हा परिषद स्तरावर हाताळली जात असल्याने जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकाऱ्यांना देखील सुनावणीसाठी बोलवावे लागते व अशा किरकोळ बाबींसाठी देखील वेळेचा अपव्यय होतो. प्रकरणे जर विहित मुदतीत हाताळली तर या बाबी उद्‌भवणार नाहीत. कर्मचाऱ्यांने मा. लोकआयुक्तांकडे तक्रार करुनही त्यांचा निपटारा होण्यासाठी गांभीर्याने पाहिले जात नाही. शिवाय, अहवाल देखील त्रोटक स्वरुपाचे असतात. त्यामुळे सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या प्रकरणी अहवाल सादर करतांना / निर्णय घेतांना अडचणी येतात. यापुढे मा. लोक आयुक्तांकडे तक्रारदाराच्या तक्रार अर्जासंबंधी मुद्देनिहाय अहवाल विहित मुदतीत पाठविण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी. तसेच सेवानिवृत्ती विषयक सर्व प्रकरणांमध्ये शासनाकडे अहवाल पाठवितांना खालील बाबींची पूर्तता करावी:-

**कर्मचाऱ्याचे नांव-**
**नियुक्तीचा दिनांक-**
**सेवानिवृत्तीचा दिनांक-**

| **अ. क्र.** | **अनुज्ञेय लाभ** | **अदा केलेली रक्कम रुपये** | **अदा केल्याचा दिनांक** | **व्याजाची परिगणना सेवानिवृत्ती- नंतर सुरु होण्याचा कालावधी** | **देय व्याज रुपये** | **अभिप्राय विलंबाची कारणे इ.** |
|---|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** |
| १ | निवृत्ती वेतन | | | सहा महिन्यांच्या कालावधी- नंतर(*) | | |
| २ | भविष्य निर्वाह निधी | | | सहा महिन्यांनतर (*) | | |
| ३ | सेवा उपदान | | | तीन महिन्यांनतर(*) | | |
| ४ | गट विमा योजना | | | तीन महिन्यांनतर (*) | | |
| ५ | अंश राशीकरण | | | व्याज अनुज्ञेय नाही (*) | | |
| ६ | रजा रोखीकरण | | | एक महिन्यांनतर (*) | | |
| ७ | ठेव संलग्न योजना | | | | | |
| ८ | स्वग्राम प्रवासभत्ता देयक | | | | | |
| ९ | इतर | | | | | |

*** कंसात प्रकरण निहाय दिनांक दर्शवावा.**

५. जिल्हा परिषदेतील सर्व विभाग प्रमुख, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सा.प्र.वि.) जिल्हा परिषद व उपायुक्त (आस्थापना) विभागीय आयुक्त कार्यालय यांनी देखील त्यांच्या स्तरावरील प्रकरणांमध्ये वरील बाबींची पूर्तता होण्याच्या दृष्टीने प्रकरणे तपासावीत. विलंबास जबाबदार असलेल्या सर्व संबंधितांवर जबाबदारी निश्चित करुन शिस्तभंगाची कारवाई करावी.

६. सेवाविषयक बाबींविषयक नियम, शासन निर्णय, परिपत्रके स्वयंस्पष्ट आहेत. तरीदेखील प्रकरणे विनाकारण मार्गदर्शनासाठी पाठविली जातात. त्यामुळे प्रकरणे निकालात निघताना विनाकारण विलंब होतो. त्यासाठी निवृत्ती वेतनादि लाभ मंजूर करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याने त्यांच्या स्तरावरचा निर्णय घेऊन प्रकरण अंतिमतः निकाली काढावे. निवृत्ती वेतन विषयक व्याज [illegible] करण्याचे अधिकार विभागीय आयुक्तांना प्रदान केले आहेत. तसेच महाराष्ट्र जिल्हा परिषदा जिल्हा सेवा नियम, १९६८ मधील नियमानुसार वर्ग-३ व वर्ग-४ च्या जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांचे सेवाविषयक बाबीसंदर्भात शासनास असलेले अधिकार विभागीय आयुक्त यांना प्रदान करण्यात आले आहेत. त्यामुळे शासनाकडे विनाकारण प्रकरणे पाठविली जाणार नाहीत याची दक्षता जिल्हा परिषदांनी घ्यावी. विवक्षित प्रकरणात शासनाच्या मंजूरीची आवश्यकता असल्यास प्रकरणे विभागीय आयुक्तांमार्फतच पाठविण्याची दक्षता जिल्हा परिषदांनी घ्यावी.

७. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२००९१११८१८५६३३००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( राजेंद्र वाघ )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

प्रति,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद.
उपआयुक्त (आस्थापना)सर्व विभागीय आयुक्त कार्यालये.
वित्त विभाग ( सेवा-७)
कार्यासन क्रमांक-आस्था- ७, ८, ९, १० व १२,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (आस्था-११), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.